प्रधानमंत्री ग्राम सडक योजना भाग-१ करिता उघडण्यात आलेल्या नवीन लेखाशिर्षास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

ग्रामविकास व जलसंधारण विभाग

**शासन निर्णय क्रमांकः ग्रासयो २०१५ / प्र.क्र.३७ / योजना-८**

बांधकाम भवन, मर्झबान पथ, फोर्ट,

मुंबई ४०० ००१.

तारीख: ४ ऑगस्ट, २०१५.

**प्रस्तावना -**

केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री ग्राम सडक योजना भाग -१ या योजनेअंतर्गत अद्यापपर्यंत मंजुर झालेल्या व यापुढे मंजुर होणाऱ्या टप्प्यांकरिता प्राप्त होणाऱ्या निधीसाठी स्वतंत्र लेखाशिर्ष उघडण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

प्रधानमंत्री ग्राम सडक योजना भाग -१ अंतर्गत अद्यापपर्यंत मंजुर झालेल्या व यापुढे मंजुर होणाऱ्या टप्प्यांकरिता प्राप्त होणाऱ्या निधीसाठी केंद्र व राज्य हिश्श्याकरिता खालील प्रमाणे नवीन लेखाशिर्ष सुरु करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

अ) केंद्र हिश्श्याकरिता - मागणी क्र. एल-३
३०५४, मार्ग व पुल
०४- इतर जिल्हा मार्ग
३३८- प्रधानमंत्री ग्राम सडक योजना
(०३)(०१)प्रधानमंत्री ग्राम सडक योजना भाग-१ अंतर्गत नवीन रस्ते जोडणी, रस्ते मजबुतीकरण व पुल बांधण्याकरिता अनुदान (केंद्र हिस्सा)(३०५४ २७५१)

ब) राज्य हिश्श्याकरिता - मागणी क्र. एल-३
३०५४, मार्ग व पुल
०४- इतर जिल्हा मार्ग
३३८- प्रधानमंत्री ग्राम सडक योजना
(०३)(०२) प्रधानमंत्री ग्राम सडक योजना भाग-१ अंतर्गत नवीन रस्ते जोडणी, रस्ते मजबुतीकरण व पुल बांधण्याकरिता अनुदान (राज्य हिस्सा) (३०५४ २७६९)

२. हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या मान्यतेने व वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्रमांक अनौसं २७९/ अर्थ-१७ दिनांक १५.५.२०१५ व अनौ. संदर्भ क्रमांक अनौसं २९७ / अर्थ-१७ दिनांक २४.६.२०१५ तसेच महालेखापाल यांच्याकडील अनौपचारीक संदर्भ क्रमांक-टीएम/सीएच-१/पीडी/युओआर-२७-२०७, दिनांक २३.५.२०१५ अन्वये व त्यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८०४१४४७०६५४२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sushama Vivek Kambli

Digitally signed by Sushama Vivek Kambli
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9899d1573c39423acfb8f67e9c8aea6d8fb6b33c61f94a33819baa81e8669f35, cn=Sushama Vivek Kambli
Date: 2015.08.04 17:15:56 +05'30'

**(सुषमा कांबळी)**
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य-१, मुंबई.
२. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य-२, नागपूर.
३. मुख्य अभियंता (प्रमंग्रासयो) महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था.
४. जिल्हा कोषागार अधिकारी, सर्व
५. राज्य गुणवत्ता समन्वयक( प्रमंग्रासयो)
६. अधीक्षक अभियंता (प्रमंग्रासयो) महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था (सर्व)
७. वित्तीय नियंत्रक ( प्रमंग्रासयो) महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था.
८. नियोजन विभाग, कार्यासन- १४४४
९. वित्त विभाग, कार्यासन अर्थ-१७
१०.कार्यासन अधिकारी योजना-९, ग्राम विकास व जलसंधारण विभाग
११.निवडनस्ती (योजना-८)